**केंद्र शासन अर्थसहाय्यीत निलक्रांती धोरणातंर्गत मत्स्यव्यवसायाचे एकात्मिक विकास व व्यवस्थापन या योजनेस प्रशासकीय मान्यता ....**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मत्स्यवि २०१६/प्र.क्र.१५९/पदुम १३**
मंत्रालय, मुंबई ४०००३२
तारीख: ६ मार्च,२०१७

वाचा:- १) केंद्र शासनाचे क्र.२७०३५-१९/२०१५-एफवाय (IV) भाग-२, भारत सरकार,कृषी व शेतकरी कल्याण, पशुसंवर्धन, दुग्ध व मत्स्य व्यवसाय विकास विभाग यांचे "निलक्रांती "धोरणांची मार्गदर्शक तत्वे २०१६.

२) केंद्र शासनाचे क्र. -३१०१३-१३/२०१६-एफवाय (३), भारत सरकार, कृषी व शेतकरी कल्याण, पशुसंवर्धन, दुग्ध व मत्स्य व्यवसाय विकास विभाग यांचे दि.१० ऑगस्ट २०१६ चे मंजूरी आदेश व दि.१० ऑगस्ट २०१६ व दि.९.१२.२०१६ रोजीचे निधी वितरण आदेश.

३) आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक मत्स्य/भू/०२२८०४/७३/२०१६, दि. ११/११/२०१६ चा प्रस्ताव.

४) कृषि व पदुम विभाग, शा.नि. क्र. मत्स्यवि /१००७प्र.क्र.८९/पदुम ,१४- दि.१८.१२.२००८

५) कृषि व पदुम विभाग , शासन निर्णय क्र. मत्स्यवि/२४०९ प्र.क्र.११/०९/पदुम-१३ ,दि.२०.२.२०१०

६) कृषि व पदुम विभाग, शा.नि. क्र. मत्स्यवि /५६४/२४१०/प्र.क्र.११३/पदुम-१४, दि.३.९.२०१०

७) कृषि व पदुम विभाग, शा.नि. क्र. मत्स्यवि २०१०/प्र.क्र.२४७/ पदुम-१४, दि.२८.९.२०१०

८) कृषि व पदुम विभाग शा.नि. क्र. मत्स्यवि २४१०/प्र.क्र.१५९/ पदुम ,१३- दि.२०.१.२०१४

९) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. मत्स्यवि-२०१६/प्र.क्र.९८/ पदुम-१३ दि.१७.१०. २०१६

**प्रस्तावना -**

राज्यातील भू-जलाशयीन ,सागरी व निमखारे पाणी क्षेत्रातील मत्स्योत्पादन मागील काही वर्षापासून स्थिर झाले आहे. या तिन्ही क्षेत्रात मत्स्योत्पादनात उपलब्ध साधनसामुग्रीच्या अधीन उत्पन्नात दुपटीने वाढ करण्याचा केंद्र शासनाच्या “निलक्रांती” धोरणांतर्गत उद्दीष्टे ठरविण्यात आले आहे.या धोरणाअतंर्गत राज्यातील मत्स्यव्यावसाईक,मत्स्यकास्तकार, मत्स्योउद्योजक यांच्या सहयोगाने राज्यातील भू-जलाशयीन, सागरी व निमखारे पाणी क्षेत्रातील नैसर्गिक साधन संपत्तीचा पूर्ण क्षमतेने वापर करून शाश्वत पध्दतीने, जैविक सुरक्षितता व पर्यावरणीय समतोल राखून मत्स्योत्पादनात वाढ करण्याचे प्रस्तावित आहे. याकरीता केंद्रशासनामार्फत मत्स्यव्यवसाय हा पुरक व अग्रक्रमीत व्यवसाय करण्याचा उद्दीष्टे ठरविण्यात आले आहे व याद्वारे भू-जलाशयीन व सागरी क्षेत्रातील सामाजीक व आर्थिकदृष्ट्या कमकूवत मत्स्यव्यवसायीकांचे उत्पन्न दुपटीने वाढविण्याचे निश्चित करण्यात आले आहे.

केंद्र शासनाच्या निलक्रांती २०१६ च्या मार्गदर्शक सूचना व त्यातील अटी व शर्तीच्या अधीन राज्य शासनाच्या मत्स्यव्यवसाय विभागामार्फत एकूण २१ योजना राज्यात राबविण्यास केंद्र शासनाने संदर्भ क्र. २ अन्वये प्रशासकीय मान्यता दिली आहे. सदर योजनांसाठी केंद्र हिस्सा व लाभार्थी / राज्य हिस्सा ५०:५० या प्रमाणात राहणार असून एकूण प्रकल्पांच्या रु.२९४१.८६ लक्ष रक्कमेपैकी रु.१४७०.९३ लक्ष इतके केंद्र शासनाचे अर्थसहाय्य उपलब्ध होणार आहे. उर्वरित ५० टक्के हिस्स्यापोटी रु.७७५.४३ लक्ष राज्य शासनास गुंतवणूक करणे आवश्यक असून उर्वरित रु.६९५.५० लक्ष इतका लाभार्थी हिस्सा रहाणार आहे. केंद्र हिस्स्यापोटीचा पहिला हप्ता रु.७३५.४६ लक्ष व दुसरा हप्ता रु.७०२.५४ लक्ष इतका निधी केंद्र शासनाने वितरीत केला आहे. तसेच गट विमा योजनेसाठी रु.३२.९३ लक्ष

केंद्र शासनाने FISHCOPFED या संस्थेस वितरीत केला असून सदर प्रकल्पाचा संपूर्ण केंद्र शासन हिश्याचा निधी वितरीत झालेला आहे. सदर २१ योजनांपैकी ९ योजना या राज्यात पूर्वीपासून कार्यरत असून त्यापैकी ३ योजना या केंद्र व राज्य हिस्सा ५० :५० या प्रमाणात आहेत. त्यामध्ये अंशत: बदलासह केंद्र शासनाने त्यास मान्यता दिली आहे. उर्वरित १२ योजना या राज्यात नव्याने राबविण्यात येणार असून सदर १२ योजनांपैकी १० योजना या केंद्र शासन व लाभार्थी हिस्सा ५०:५० या प्रमाणात आहेत. उर्वरित दोन योजना हया केंद्र शासन व राज्य शासन हिस्सा ५०:५० या प्रमाणात राहणार आहे.

सदर योजना राज्यात राबविण्यासाठी पूर्वी कार्यरत ९ योजना सुधारीत / बदलांसह व १२ नवीन योजनांच्या प्रस्तावास मा.मंत्रिमंडळाच्या मान्यतेसाठी दि.३.३.२०१७ रोजीच्या बैठकीत ठेवण्यात आला होता. विभागाच्या सदर प्रस्तावास मा. मंत्रिमंडळाने मान्यता प्रदान केली असून सदर मान्यतेनुसार, राज्यातील भू-जलाशयीन, सागरी व निमखारे पाणी क्षेत्रातील कार्यरत योजनांचे अस्तित्वातील शासन निर्णय आवश्यक तेथे अधिक्रमित करुन व नवीन योजना अंर्तभूत करुन याप्रमाणे केंद्रशासनाची “निलक्रांती” ही योजना राज्यात राबविण्याकरीता प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :

केंद्रशासनाने "निलक्रांती" योजनेअंतर्गत मत्स्यव्यवसायाचे एकात्मीक विकास व व्यवस्थापनाद्वारे राज्याचे मत्स्योत्पादनात दुपटीने वाढ करण्याकरीता ठरवून दिलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार राज्यातील भू-जलाशयीन, सागरी व निमखारे पाणी क्षेत्रातील खालील योजनांना केंद्र शासनाच्या मंजूर आराखड्याप्रमाणे व ठरवून दिलेल्या कार्यपध्दतीनुसार खालील तक्त्यात नमूद केल्यानुसार प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

| <u>अ. क्र.</u> | <u>योजनेचे नाव</u> | <u>योजनेचे लेखाशिर्ष</u> | <u>सन २०१६-१७ मंजूर निधी</u> | <u>योजनेचा तपशील</u> |
|---|---|---|---|---|
| I) | **<u>भू-जलाशयीन तळी, दलदली भाग (Wetlands), जलाशय व थंडपाण्यातील (Cold Water) योजना</u>** | | | |
| १ | <u>अधिक्रमित करुन</u> नवीन मत्स्यसंवर्धन तळी तयार करणे (construction of new ponds) शासन निर्णय क्र. मत्स्यवि /२४०९प्र.क्र.११/०९/ पदुम-१३ , दि.२०.२.२०१० | *मागणी क्र. डी-६, २४०५ मत्स्यव्यवसाय,१०१ भूजल मत्स्यव्यवसाय,(०२) पंचवार्षिक योजनेअंतर्गत योजना,(०२)(०४) मत्स्यशेती विकास अभिकरण,केंद्र पुरस्कृत योजना,३१ सहायक अनुदान (२४०५०८२५)* | रु.१०५.०० लक्ष (केंद्र हिस्सा रु.५२.५० लक्ष व लाभार्थी हिस्सा रु.५२.५० लक्ष) | **उद्दीष्टय-** भू-जलाशयीन क्षेत्रात पाण्याचे स्त्रोत असलेल्या व सुयोग्य ठिकाणी मत्स्यतळयाची निर्मिती करून मत्स्यबीजाचे साठवणूक करून मत्स्यसंवर्धनद्वारे मत्स्योत्पादनात वाढ व मत्स्यकास्तकारांचे आर्थिक उन्नती करणे.<br><br>**योजनेचे निकष व अटी/ शर्ती-**<br>१) लाभार्थींची स्वत:ची जागा असणे आवश्यक आहे. N.O.C. ची जबाबदारी लाभार्थींची राहिल. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | २) बांधकाम केल्यानंतर पाण्याची पातळी १.५ मीटर असणे गरजेचे आहे.<br>३) केंद्राचे अर्थसहाय्य २ हे.पर्यंत सर्वसाधारण लाभार्थ्यास व सहकारी संस्थांसाठी त्याची मर्यादा २० हे.पर्यंत असेल.<br>४) केंद्रीय व राज्य सरकारच्या अखत्यारित असलेल्या शिखर संस्था, महामंडळ व संस्था यांचे प्रस्ताव राज्य शासनाच्या शिफारशीसह सादर करणे आवश्यक आहे.<br>**अर्थसहाय्याचे स्वरुप-**<br>१. केंद्र हिस्सा व लाभार्थी हिस्सा ५०: ५० या प्रमाणात<br>२. नवीन तळी बांधकामासह त्यामध्ये पाण्याची पातळीचे नियंत्रण करणारी यंत्रणा (Sluice gates), पाणी पुरवठयांच्या सोयी व एरियेशन सयंत्रणा, खाद्य ठेवण्याचे गोदाम इत्यादीकरीता रूपये ७.०० लक्ष/ प्रति हेक्टर च्या मर्यादेत (५० टक्के केंद्रशासन रू.३.५० लक्ष / प्रति हेक्टर उर्वरीत ५० टक्के लाभार्थी हिस्सा राहील.)<br>**३.** सन २०१६-१७ साठी सदर योजनेमध्ये १५ संचाचा समावेश असून त्यासाठी रु.५२.५० लक्ष केंद्र शासनाचा हिस्सा राहणार आहे. |
| २ | भारतीय प्रमुख कार्प व इतर संवर्धनक्षम माश्यांच्या मत्स्यबीजासाठी मत्स्यबीज निर्मिती | लेखाशिर्ष उघडण्याची स्वतंत्रपणे कार्यवाही करण्यात येईल. | रु.५०.०० लक्ष (केंद्र हिस्सा रु.२५.०० लक्ष व लाभार्थी हिस्सा रु.२५.०० लक्ष) | **उद्दीष्टय-** राज्यातील पाटबंधारे तलाव, जिल्हा परिषद तलाव, मालगुजारी, ग्रांम पंचायत तलाव, खाजगी तलाव तसेच मत्स्यसंगोपन तलावात मत्स्योत्पादनासाठी |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | केंद्राची स्थापना करणे (Establishment of Hatchery for IMC and other cultivable fin fishes) :- | | | मत्स्यबीजांच्या साठवणूकीची आवश्यक आसते. विभागाच्या तसेच राज्यातील सद्याच्या खाजगी मत्स्यबीज निर्मिती केंद्रातून राज्यातील सर्व तलावासाठी मत्स्यबीजाचा पुरवठा होत नसल्याने बऱ्याच प्रमाणात इतर राज्यातून मत्स्यबीजाची आयात केली जाते. राज्याची मत्स्यबीजाची गरज भागविण्यासाठी खाजगी मत्स्यबीज उत्पादन मत्स्यकारांना स्थानिकरीत्या मत्स्यबीज निर्मितीस प्रोत्साहीत करण्यासाठी केंद्रशासनाच्या अर्थसहाय्यातून मत्स्यबीज निर्मिती केंद्राची योजना राबविणे.<br>**योजनेचे निकष व अटी/ शर्ती-**<br>१) लाभार्थीची स्वत:ची जागा असणे आवश्यक आहे. N.O.C. ची जबाबदारी लाभार्थीची राहिल.जैव सुरक्षेकरिता उपायाबाबतचा तपशील प्रकल्प प्रस्तावासोबत जोडणे आवश्यक राहील.<br>२) लाभार्थी /संस्था यांनी राज्यशासनामार्फत आपले प्रस्ताव सादर करावेत.<br>३) केंद्र शासन व राज्यशासनाच्या संस्था /महामंडळ / संघराज्य इ. त्यांचे प्रस्ताव सरळ NFDB ला पाठवू शकतात.<br>४) कमीत कमी २ हेक्टर जागेमध्ये मत्स्यबीज केंद्राची उत्पादन क्षमता कमीत कमी १० दशलक्ष मत्स्य जिरे प्रती वर्ष इतकी असली पाहिजे. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | ५) केंद्रामध्ये प्रजनक साठवणूक तळी, संगोपन तळी, संवर्धन तळी, लहान प्रयोगशाळा, पाणी व वीज पुरवठा आवश्यक सोयी सुविधा असणे आवश्यक आहे.<br>६) केंद्रामध्ये प्रशिक्षित तांत्रिक कर्मचारी नियंत्रण असणे आवश्यक आहे.<br>७) लाभार्थ्याने/लाभार्थी संस्थेने केंद्रीय मदतीच्या उत्पादन केंद्रामधून मत्स्यसंवर्धकांना वाजवी दरात मत्स्यबीज उपलब्ध होईल याची खात्री करावी.<br>८) लाभार्थ्यांनी मत्स्यबीज केंद्राच्या स्थापनेनंतरची बांधकामे देखभाल समाधानपूर्वक स्वत:च्या खर्चात करावी.<br>९) योग्य स्थळी व्यावसायिक दृष्टिकोन लक्षात घेता NFDB हॅचरीवर नियंत्रण करेल.<br>**अर्थसहाय्याचे स्वरुप-**<br>१.केंद्र हिस्सा व लाभार्थी हिस्सा ५०: ५० या प्रमाणात<br>२.मत्स्यबीज निर्मिती केंद्राकरीता २ हेक्टर पर्यंत जागेकरीता रू.२५.००लक्ष/हॅचरी च्या मर्यादेत (केंद्रशासनाचे ५० टक्के म्हणजेच रू.१२.५० लक्ष/हॅचरी अर्थसहाय्य व उर्वरीत ५० टक्के लाभार्थी हिस्सा राहील) .<br>३. सन २०१६-१७ साठी सदर योजनेमध्ये २ हॅचरी समाविष्ट असून त्यासाठी ५०टक्के म्हणजेच रु.२५.०० लक्ष केंद्र शासनाचा हिस्सा राहणार आहे. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ३ | **अधिक्रमित करुन** मत्स्यबीज संवर्धन तलावसंच (Fish seed rearing unit):- शा.नि. क्र. मत्स्यवि /२४०९प्र.क्र.११/०९/ पदुम-१३ , दि.२०.२.२०१० | मागणी क्र. डी,६ २४०५ मत्स्यव्यवसाय, १०१ भूजल मत्स्यव्यवसाय, (०२) पंचवार्षिक योजनेअंतर्गत योजना,(०२)(०४) मत्स्यशेती विकास अभिकरण,केंद्र पुरस्कृत योजना,३१ सहायक अनुदान (२४०५०८२५) | रु.६०.०० लक्ष (केंद्र हिस्सा रु.३०.०० लक्ष व लाभार्थी हिस्सा रु.३०.०० लक्ष) | **उद्दीष्टय- मत्स्योत्पादन** तलावामध्ये मत्स्योत्पादनात वाढ होण्यासाठी उच्च प्रतीचे व मोठया आकाराचे मत्स्यबीज सोडणे आवश्यक असते. जेणेकरून मत्स्यसंवर्धनादरम्यान किमान मरतूक होऊन प्रति हेक्टरी अधित्तम मत्स्योत्पादन घेणे शक्य होईल. याकरीता मोठया आकाराच्या मत्स्यबीज म्हणजे बोटूकलीच्या निर्मितीसाठी मत्स्यबीज निर्मिती केंद्रातून लहान आकाराचे मत्स्यजिरे प्राप्त करून शास्त्रोक्त पध्दतीने संवर्धनासाठी अधिकाधिक मत्स्यसंवर्धन तळी निर्मिती करणे.<br>**योजनेचे निकष व अटी/ शर्ती-**<br>१) लाभार्थींची स्वत:ची जागा असणे आवश्यक आहे. N.O.C. ची जबाबदारी लाभार्थींची राहिल.<br>२) बांधकाम केल्यानंतर पाण्याची पातळी १.५ मीटर असणे गरजेचे आहे.<br>३) केंद्राचे अर्थसहाय्य २ हे.पर्यंत व सहकारी संस्थांच्या केंद्रासाठी प्रत्येक सभासदाला प्रति दोन हेक्टरपर्यंतच्या मर्यादित प्रकल्प आर्थिकदृष्टया किफायतशीर होईल, याची पडताळणी करुन राज्यशासनाच्या शिफारशीसह केंद्र शासनाला मंजूरीसाठी सविस्तर प्रकल्प अहवाल पाठविणे आवश्यक राहील.<br>४) केंद्रीय व राज्य सरकारच्या अखत्यारित असलेल्या शिखर संस्था, महामंडळ व संस्था यांचे प्रस्तावाबाबत हेक्टरची मर्यादा ही |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | संबंधित राज्याशी सल्लामसलत केल्यानंतर ठरविण्यात येईल.<br>**अर्थसहाय्याचे स्वरुप-**<br>१. केंद्र हिस्सा व लाभार्थी हिस्सा ५०: ५० या प्रमाणात<br>२. मत्स्यकास्तकारास एकूण प्रकल्प किंमत रू.६.०० लक्ष/हेक्टर च्या मर्यादेत (केंद्रशासनाचे ५० टक्के रू.३.०० लक्ष / प्रति हेक्टर अर्थसहाय्य अनुज्ञेय असून उर्वरीत ५० टक्के लाभार्थ्यांचा हिस्सा राहील).<br>**३.** सन २०१६-१७ मध्ये सदर योजनेत ६ संचासाठी १० हेक्टर च्या मर्यादेत असून त्यासाठी५० टक्के म्हणजेच रु.३०.०० लक्ष केंद्र शासनाचा हिस्सा राहणार आहे. |
| ४ | <u>अधिक्रमित करुन</u> गोडेपाण्यातील मत्स्यसंवर्धनांतर्गत निविष्ठाखर्च अर्थसहाय्य (Input cost for fresh water fish culture):-<br>शा.नि. क्र. मत्स्यवि /२४०९प्र.क्र.११/०९/ पदुम-१३ , दि.२०.२.२०१० | *मागणी क्र. डी,६ २४०५ मत्स्यव्यवसाय, १०१ भूजल मत्स्यव्यवसाय, (०२) पंचवार्षिक योजनेअंतर्गत योजना,(०२)(०४) मत्स्यशेती विकास अभिकरण, केंद्र पुरस्कृत योजना, ३१ सहायक अनुदान (२४०५०८२५)* | रु.९३.०० लक्ष (केंद्र हिस्सा रु.४६.५० लक्ष व लाभार्थी हिस्सा रु.४६.५० लक्ष) | **उद्दीष्टय -**<br>१) नवीन तयार केलेली मत्स्यसंवर्धन तळी २) नुतणीकरण केलेली मत्स्यतळी ३) मनरेगा आणि राज्यशासन/ केंद्रशासनाच्या विविध योजनेअंतर्गत बांधण्यात आलेल्या तलाव, तळी व जलसाठे असलेल्या तलावांचे नुतणीकरण केलेल्या तसेच ४) शहरी, निमशहरी व ग्रामीण भागातील मत्स्यसंवर्धनाचे तलाव व तळी यामध्ये सदरची योजना लागु राहील. प्रस्तूत योजनेअतंर्गत मत्स्य/ कोळंबी बीज, मत्स्यखाद्य, खते, रोगप्रतिबंधक उपाययोजना व वाहतूक खर्च इत्यादीचा अंतर्भाव राहील.<br>**योजनेचे निकष व अटी/ शर्ती-**<br>१) लाभार्थीला नवीन बांधलेल्या तलावासाठी/नुतनीकरण केलेल्याचा लाभ अनुज्ञेय राहील. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | २) तलावाचे बांधकाम पर्ण असून संवर्धनासाठी तयार असल्यानंतरच अनुदान देण्यात येईल.<br>**अर्थसहाय्याचे स्वरुप-**<br>१. केंद्र हिस्सा व लाभार्थी हिस्सा ५०:५० या प्रमाणात<br>२. अ) मत्स्यसंवर्धनाकरीता, मत्स्यकास्तकारास एकूण प्रकल्प किंमत रू.१.५० लक्ष/हेक्टर च्या मर्यादेत (केंद्रशासनाचे ५० टक्के म्हणजेच रू.०.७५ लक्ष / प्रति हेक्टर अर्थसहाय्य अनुज्ञेय असून उर्वरीत ५० टक्के लाभार्थ्यांचा हिस्सा राहील.<br>ब) कोळंबीसंवर्धनाकरीता, कोळंबीसंवर्धनकास्तकारास एकूण प्रकल्प किंमत रू.२.५० लक्ष/हेक्टर च्या मर्यादेत (केंद्रशासनाचे ५० टक्के म्हणजेच रू.१.२५ लक्ष / प्रति हेक्टर अर्थसहाय्य अनुज्ञेय असून उर्वरीत ५० टक्के लाभार्थ्यांचा हिस्सा राहील.)<br>३. सन २०१६-१७ साठी सदर योजनेत ६२ हेक्टर मर्यादेतील प्रस्तावांसाठी५० टक्के म्हणजेच रु.४६.५० लक्ष केंद्र शासनाचा हिस्सा राहणार आहे. |
| ५ | जलाशयात व खुल्या जलक्षेत्रात पिंजरा(Cage) / बंदीस्त (Pen)उभारणे (Installation of cages /Pens in reservoirs and other open water bodies) :- | लेखाशिर्ष उघडण्याची कार्यवाही स्वतंत्रपणे करण्यात येईल. | रु.१८०.०० लक्ष (केंद्र हिस्सा रु.९०.०० लक्ष व लाभार्थी हिस्सा रु.९०.०० लक्ष) | **उद्दीष्टय -** सद्यसिस्थीत जलाशयात व खुल्या जलक्षेत्रात मत्स्यबीजाची साठवणूक करून अनियंत्रीत व पारंपारिक पध्दतीने मत्स्योत्पादन घेतले जाते. त्याव्यतिरीक्त या जलस्त्रोतात अत्याधुनिक तत्रंज्ञान व शास्त्रोत पध्दतीने या जलाशयात एकूण जलक्षेत्राच्या १ टक्के जलक्षेत्र पिंजरा व बंदीस्त पध्दतीने मत्स्यसंवर्धन |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | शासन निर्णय क्र. मत्स्यवि-२०१६/प्र.क्र.९८/ पदुम-१३ दि.१७ ऑक्टोबर, २०१६ अन्वये पिंजरा पध्दतीने मत्स्यसंवर्धन करण्याचे धोरण निश्चित केले आहे. | | | केल्यास सिमित क्षेत्रात नियंत्रीत पध्दतीचा वापर जास्तीत-जास्त मत्स्योत्पादन घेणे शक्य होईल.<br>**योजनेचे निकष व अटी/ शर्ती-**<br>१) सदरची योजना एन.एफ.डी.बी.मार्फत व्यावहारिक दृष्टिकोन ठेवून राबविण्यात येणार आहे.<br>२) प्रस्ताव एन.एफ.डी.बी.कडे सादर करावा.<br>३) प्रस्ताव सादर करण्यापूर्वी संबंधित राज्यशासनाची पूर्वपरवानगी घेणे आवश्यक आहे.<br>४) मच्छीमार सहकारी संस्था, अ.जा. व अ.ज. सहकारी संस्था, महिला बचत गट, नोंदणीकृत व्यावसायिक इत्यादि अर्थसहाय्याकरिता पात्र ठरतील. एका लाभार्थ्यास जास्तीत जास्त ६ पिंजऱ्यांचे १ याप्रमाणे ४ बॅटरी (२४ पिंजरे) अनुज्ञेय राहतील.<br>५) केंद्र व राज्य शासनाच्या संघटना, महामंडळ, संघ, यंत्रणा इत्यादिंना प्रकरणनिहाय अर्थसहाय्य मंजूर करण्यात येईल.<br>६) प्रकल्पकिंमतीमध्ये भांडवली, आवर्ती व व्यवस्थापनाचा खर्च समाविष्ट राहिल.<br>७) अर्जदाराने परिपूर्ण प्रस्ताव कागदपत्रे व योग्य त्या परवानग्यासह सादर कराव्या.<br>**अर्थसहाय्याचे स्वरुप-**<br>१. केंद्र हिस्सा व लाभार्थी हिस्सा ५०:५० या प्रमाणात<br>२. या योजनेअंतर्गत मोठया व खुल्या जलाशयात पिंजरा उभारणे तसेच प्रथम पीक वर्षाकरीता निविष्ठेसाठी यात मत्स्यबीज, |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | मत्स्यखाद्य,खते, रोगप्रतिबंधक उपाययोजना व वाहतूक खर्च इत्यादीकरीता पिंजरा(Cage) / बंदीस्त (Pen)उभारणेसाठी, मत्स्यसंवर्धकास एकूण प्रकल्प किंमत रू.३.००लक्ष/ प्रति पिंजरा(Cage) / बंदीस्त( Pen)उभारणी च्या मर्यादेत केंद्रशासनाचे ५० टक्के म्हणजेच रू.१.५० लक्ष /प्रति पिंजरा(Cage) / बंदीस्त Pen)उभारणीस अर्थसहाय्य अनुज्ञेय असून उर्वरीत ५० टक्के लाभार्थ्यांचा हिस्सा राहील.<br>**३.** सन २०१६-१७ साठी सदर योजनेत ६० संचाचा समावेश असून त्यासाठी ५०टक्के म्हणजेच रु.९०.०० लक्ष केंद्र शासनाचा हिस्सा राहणार आहे. |
| ६ | <u>अधिक्रमित करुन</u> मत्स्यसंवर्धन तळयाचे नुतनीकरण (Renovation of existing ponds) | *मागणी क्र. डी,६ २४०५ मत्स्यव्यवसाय, १०१ भूजल मत्स्यव्यवसाय, (०२) पंचवार्षिक योजनेअंतर्गत योजना,(०२)(०४) मत्स्यशेती विकास अभिकरण,केंद्र पुरस्कृत योजना, ३१ सहायक अनुदान (२४०५०८२५)* | रु.१७५.०० लक्ष (केंद्र हिस्सा रु.८७.५० लक्ष व लाभार्थी हिस्सा रु.८७.५० लक्ष) | **उद्दीष्टय -** ५ वर्षापूर्वी बांधण्यात आलेले मत्स्यसंवर्धन तळयांचे नुतणीकरणकरून तळयांची बांधांची मजबूतीकरण, विदयुतीकरण दुरूस्ती, पाणी पुरवठयांची कामे व इतर सोयी-सुविधां उपकरणे, तलावातील गाळ काढणे, पाण्याची पातळीचे नियंत्रण करणारी (Sluice gates) यंत्रणेची दुरूस्ती, तलाव आटविणे इत्यादी कामे अनुज्ञेय राहतील.<br>**योजनेचे निकष व अटी/ शर्ती-**<br>१) लाभार्थ्यांनी तयार तळयाचे कागदपत्र DPR सोबत जोडणे आवश्यक आहे.<br>२) तळयांच्या नुतनीकरण/दुरुस्ती अस्तरीकरण इत्यादि कामाकरिता ५ वर्षानंतर निधी उपलब्ध होऊ शकतो. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | ३) केंद्राचे अर्थसहाय्य २ हे.पर्यंत सर्वसाधारण लाभार्थ्यासाठी व सहकारी संस्थांसाठी त्याची मर्यादा २० हे.पर्यंत आहे.<br>४) केंद्रीय व राज्य सरकारच्या अखत्यारित असलेल्या शिखर संस्था, महामंडळ व संस्था यांचे प्रस्ताव राज्य शासनाच्या शिफारशीसह सादर करणे आवश्यक आहे.<br>**अर्थसहाय्याचे स्वरुप-**<br>१. केंद्र हिस्सा व लाभार्थी हिस्सा ५० :५० या प्रमाणात<br>२. सदर योजनेअंतर्गत रू.३.५० लक्ष/हेक्टर च्या मर्यादेत केंद्रशासनाचे ५० टक्के म्हणजेच रू.१.७५ लक्ष/हेक्टर अर्थसहाय्य अनुज्ञेय राहील व उर्वरीत ५० टक्के लाभार्थ्याचा हिस्सा राहील.<br>सन २०१६-१७ मध्ये सदर योजनेअंतर्गत ५० हेक्टरच्या मर्यादेत ३५ संचांसाठी ५०टक्के म्हणजेच रु.८७.५० लक्ष केंद्र शासनाचा हिस्सा राहणार आहे. |
| <u>II)</u> | <u>निमखारे पाण्यातील योजना (Plan for Brackishwater)</u> | | | |
| ७ | <u>अधिक्रमित करुन</u> निमखारे पाण्यातील कोळंबी संवर्धनासाठी निविष्ठा (Brackishwater shrimp culture-input):-<br>शा.नि. क्र. मत्स्यवि /५६४/२४१०/प्र.क्र. ११३/पदुम-१३, दि.३.९.२०१० | | रु.३००.०० लक्ष (केंद्र हिस्सा रु.१५०.०० लक्ष व लाभार्थी हिस्सा रु.१५०.०० लक्ष) | **उद्दिष्टय-** राज्याच्या सागरी किनाऱ्यावरील खाजण क्षेत्रात प्रामुख्याने पी.मोनोडॉन व एल. वेनामी या जातीच्या कोळंबीचे संवर्धन करण्यात येते. या कोळंबी संवर्धकांना अधिकत्तम उत्पादन घेण्यास प्रोत्साहीत करण्यासाठी सदर योजनेचा उद्देश आहे.<br>**योजनेचे निकष व अटी/ शर्ती-**<br>१) सदरची योजना एन.एफ.डी.बी.मार्फत व्यावहारिक |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | दृष्टिकोन ठेवून राबविण्यात येणार आहे.<br>२) प्रस्ताव एन.एफ.डी.बी.कडे सादर करावा.<br>३) प्रस्ताव सादर करण्यापूर्व संबंधित राज्यशासनाची पूर्वपरवानगी घेणे आवश्यक आहे.<br>४) मच्छीमार सहकारी संस्था, अ.जा. व अ.ज. सहकारी संस्था , महिला बचत गट, नोंदणीकृत व्यावसायिक इत्यादि अर्थसहाय्याकरिता पात्र ठरतील. एका लाभार्थ्यास जास्तीत जास्त ६ पिंजऱ्यांचे १ याप्रमाणे ४ बॅटरी (२४ पिंजरे) अनुज्ञेय राहतील.<br>५) केंद्र व राज्य शासनाच्या संघटना, महामंडळ, संघ, यंत्रणा इत्यादिंना प्रकरणनिहाय अर्थसहाय्य मंजूर करण्यात येईल.<br>६) प्रकल्प किंमतीमध्ये भांडवली, आवर्ती व व्यवस्थापनाचा खर्च समाविष्ट राहिल.<br>७) अर्जदाराने परिपूर्ण प्रस्ताव कागदपत्रे व योग्य त्या परवानग्यासह सादर कराव्या.<br>**अर्थसहाय्याचे स्वरुप –**<br>१. कोळंबी संवर्धन - एल.वेणामी/ पी मानोडॉन , इत्यादी संर्वधनासाठी येणाऱ्या खर्चापोटी रु.३.००लक्ष च्या मर्यादेत (केंद्रशासनाचे ५० टक्के म्हणजेच रू.१.५०लक्ष/हेक्टर अर्थसहाय्य अनुज्ञेय राहील व उर्वरीत ५० टक्के लाभार्थी हिस्सा राहील.)<br>२. सदरचे अनुदान कोळंबी संवर्धनास तयार असलेल्या तलावास अनुज्ञेय राहील. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | सन २०१६-१७ साठी सदर योजनेत १०० हेक्टरसाठी ५० टक्के म्हणजेच रु.१५०.०० लक्ष केंद्र शासनाचा हिस्सा राहणार आहे. |
| ८ | निमखारे पाण्यातील कोंळबी बीज उत्पादन केंद्राची उभारणी (Brackishwater hatchery) :- | लेखाशिर्ष उघडण्याची कार्यवाही स्वतंत्रपणे करण्यात येईल. | रु.५०.०० लक्ष (केंद्र हिस्सा रु.२५.०० लक्ष व लाभार्थी हिस्सा रु.२५.०० लक्ष) | **उद्दिष्टय -** राज्यातील निमखाऱ्या पाण्यातील कोळंबी संवर्धनासाठी आवश्यक बीज पुरवठा करण्यासाठी एकही कोळंबी बीज उत्पादन केंद्र कार्यरत नाही. राज्यातील कोळंबी संवर्धक इतर राज्यातून कोळंबी बीजाची आयात करून कोळंबी संवर्धन करत असतात. याकरीता स्थानिक कोळंबी बीजाची गरज भागविण्यासाठी खाजगी कास्तकारांना प्रोत्साहीत करण्यासाठी केंद्रशासनाच्या अर्थसहाय्यातून सदर योजना राबविण्याचे उद्दीष्टे आहे.<br><br>**योजनेचे निकष व अटी/ शर्ती-**<br>१) लाभार्थीला कोळंबी बिज उत्पादन केद्रांचे अनुभव असणे आवश्यक आहे.<br>२) लाभार्थी ज्या जागेत संर्वधन करणार आहे ती जागा अतिक्रमण बाधित नसावी तसेच प्रकल्प उभारण्यासाठी लाभार्थीला स्वत:ला करावयाच्या खर्चासंबंधी वित्तीय कागदपत्रे सादर करणे आवश्यक व तसा उल्लेख डी.पी.आर. नमुद करणे आवश्यक आहे.<br>३) लाभार्थीने त्याच्या कोळंबी बीज उत्पादन केद्रात हे स्थानिक संर्वधकांना घाऊक बाजार भावाने पुरवठा करणे आवश्यक आहे. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | **अर्थसहाय्याचे स्वरुप** -<br>१. प्रति कोळंबी बिजकेद्रासाठी वार्षिक ५ दशलक्ष पोस्ट लार्वा (Post Larvae) आकाराचे कोळंबी बिज तयार करण्यासाठी प्रकल्प किमंती ऐवढे अर्थसहाय्य परंतु रु.५०.०० लक्षच्या मर्यादेत केंद्रशासनाचे ५० टक्के म्हणजेच रू.२५.०० लक्ष/बिजकेद्र अर्थसहाय्य अनुज्ञेय राहील व उर्वरीत ५० टक्के लाभार्थी हिस्सा राहील.<br>२. सन २०१६-१७ साठी सदर योजनेत १ हॅचरीसाठी ५० टक्के म्हणजेच रु.२५.०० लक्ष केंद्र शासनाचा हिस्सा राहणार आहे. |
| <u>III)</u> | <u>भू-जलाशयीन मूलभूत सुविधा पुरविण्याची योजना (Plan for infrasture Inland)-</u> | | | |
| ९ | <u>अधिक्रमित करुन</u> नवीन नौका व जाळी खरेदी करणे (Craft & Gear):-<br>*शा.नि. क्र. मत्स्यवि २०१०/प्र.क्र.२४७/ पदुम-१४, दि.२८.९.२०१०* | ***सदर योजनेच्या धर्तीवर कार्यरत योजना ही जिल्हा वार्षिक योजनेअंतर्गत कार्यरत आहे. त्यामुळे लेखाशिर्ष अस्तित्वात नाही.*** *सबब,* लेखाशिर्ष उघडण्याची कार्यवाही स्वतंत्रपणे करण्यात येईल | रु.२५.०० लक्ष (केंद्र हिस्सा रु.१२.५० लक्ष व लाभार्थी हिस्सा रु.१२.५० लक्ष) | **उद्दिष्टय** -भू-जलाशयीन क्षेत्रातील जाळी व होडया वेगवेगळया पध्दतीच्या असून मोठया व छोटया जलाशयात मासे पकडण्यासाठी व पकडण्यात आलेली मासळी जलद गतीने विक्री करण्यासाठी व पकडलेली मासळी अधिक काळ सुस्थितीत टिकवून ठेवण्यासाठी शितपेटी पुरवठा करून मच्छीमारांना अधिकाधिक उत्पादन व मासळीस चांगला भाव मिळवून देऊन मच्छीमारांचे जीवनमान उंचावण्याचा सदर योजनेचा उद्देश आहे.<br>**योजनेचे निकष व अटी/ शर्ती-**<br>१) आर्थिक सहाय्याबाबतचा प्रकरणनिहाय अहवाल सादर करणे अपेक्षित आहे. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | २) गटनिहाय किंवा एकत्रित प्रस्ताव सुध्दा मंजूर करण्यात येतील.<br>३) मासेमारी करण्याबाबतचे नियम व अटी शर्ती लागू राहतील.<br>४) ५ वर्षापूर्वीच्या जुन्या नौकेसही अर्थसहाय्य मंजूर करण्यात येईल.<br>**अर्थसहाय्याचे स्वरुप –**<br>१. सदर योजने अंतर्गत रु.१.०० लक्ष / संच च्या मर्यादेत (केंद्रशासनाचे ५० टक्के म्हणजेच रू.०.५०लक्ष/संच अर्थसहाय्य अनुज्ञेय राहील व उर्वरीत ५० टक्के लाभार्थी हिस्सा राहील.)<br>२. सदरची योजना मत्स्यकास्तकारांच्या गटास एकत्रीतपणेही लागू राहील.<br>**३.** सन २०१६-१७ साठी सदर योजनेत २५संचासाठी ५० टक्के म्हणजेच रु.१२.५० लक्ष केंद्र शासनाचा हिस्सा राहणार आहे. |
| **१०** | लघु मत्स्यखाद्य बनविण्याच्या कारखान्याची स्थापना (Establishment of Small feed mill):- | लेखाशिर्ष उघडण्याची कार्यवाही स्वतंत्रपणे करण्यात येईल | रु.१००.०० लक्ष (केंद्र हिस्सा रु.५०.०० लक्ष व लाभार्थी हिस्सा रु.५०.०० लक्ष) | **उद्दिष्टय** -गोडया पाण्यातील मत्स्योत्पादन वाढविण्याकरीता शास्त्रीय व तांत्रीक पध्दतीने प्रथिनेयुक्त खाद्याची मात्रा देणे आवश्यक असते. माश्यांना योग्य प्रमाणात आवश्यकतेनुसार खाद्य दिल्यास माश्यांची वाढ जलद व योग्य प्रमाणात होवून निश्चित उत्पादनाची वाढ होणे अपेक्षीत आहे. सद्यस्थितीत राज्यात मत्स्यखाद्य बनविण्याचा कारखाना नसल्याने परराज्यातून तयार मत्स्यखाद्याचा पुरवठा होत आहे. ही बाब लक्षात घेऊन राज्यामध्ये केंद्र शासनाच्या अर्थसहाय्याने लघु मत्स्यखाद्य |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | बनविण्याच्या कारखान्याची निर्मिती करणे या योजनेचा उद्देश आहे.<br>**योजनेचे निकष व अटी/ शर्ती-**<br>१) लाभार्थ्यांनी प्रकल्प प्रस्तावामध्ये मत्स्यखाद्य कारखान्याचे पूर्ण समर्थन व तांत्रिक तपशील सादर करावा.<br>२) लाभार्थ्यांनी प्रकल्प प्रस्तावामध्ये मत्स्यखाद्य कारखान्याचे पूर्ण समर्थन व तांत्रिक तपशील सादर करावा.<br>३) लाभार्थ्याने/संस्थेने केंद्राच्या अर्थसहाय्याने निर्माण झालेले मत्स्यखाद्य वाजवी दरात मत्स्यसंवर्धकाला मिळेल याची खात्री करावी.<br>४) मत्सयखाद्य कारखाना निर्माण झाल्यानंतरची कामे, बांधकाम, नियंत्रण व देखभाल इत्यादि बाबत खर्च लाभार्थ्यांने समाधानकारकरित्या स्वत:च्या खर्चात करावा.<br>५) व्यावसायिक/संस्था यांनी प्रकल्प प्रस्ताव राज्यशासनाच्या योग्य मार्गाने सादर करावेत.<br>६) केंद्र शासन व राज्यशासनाच्या संघटना यांनी संघराज्ये, महामंडळ इत्यादिंनी प्रकल्प प्रस्ताव सरळ पदुम विभागाकडे सादर करावेत. आर्थिक मदत संबंधितांच्या सल्ल्याने ठरविण्यात येईल.<br>७) योग्य जागेवर एन.एफ.डी.बी.सुध्दा व्यावसायिक दृष्टिकोन ठेवून मत्स्यखाद्य कारखाना उभारेल.<br>**अर्थसहाय्याचे स्वरुप-**<br>१. सदर योजने अंतर्गत रु.१०.००लक्ष /प्रकल्प (क्षमता -१ ते ५ क्विंटल प्रति दिन) च्या मर्यादेत |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | (केंद्रशासनाचे ५० टक्के म्हणजेच रू.५.००लक्ष/प्रकल्प अर्थसहाय्य अनुज्ञेय राहील व उर्वरीत ५० टक्के लाभार्थी हिस्सा राहील.)<br>२. सन २०१६-१७ साठी सदर योजनेत १० संचासाठी ५० टक्के म्हणजेच रु.५०.०० लक्ष केंद्र शासनाचा हिस्सा राहणार आहे. |
| <u>IV</u> | <u>सागरी क्षेत्रातील मत्स्य संवर्धन/पिंजरा पध्दत ( Plan for Capture fisheries / cage culture ( Marine)</u> | | | |
| ११ | शिंपले संवर्धन (Bivalve culture):- | लेखाशिर्ष उघडण्याची कार्यवाही स्वतंत्रपणे करण्यात येईल. | रु.३.०० लक्ष (केंद्र हिस्सा रु.१.५० लक्ष व लाभार्थी हिस्सा रु.१.५० लक्ष) | **उद्दिष्टय-** समुद्र किनारी व खाडीक्षेत्रात नैसर्गिक उत्पादना व्यतिरिक्त नियंत्रीत पध्दतीने शिंपले बीजाचे रोपण करून शिंपले संवर्धनाद्वारे महिला स्वंयसहाय्यता बचत गटांना तसेच मच्छीमार महिलांना स्वंय रोजगाराद्वारे पुरक व्यवसाय उपलब्ध करून देण्याच्या सदर योजना राबविण्याचा उद्देश आहे.<br>**योजनेचे निकष व अटी/ शर्ती-**<br>१) शिंपले संवर्धनासाठी आवश्यक असलेला बांबू फळी उभारण्यासाठी आवश्यक असलेली परवानगी विविध विभागाकडून अर्जदाराला मिळवावी लागेल.<br>२) सदर योजनेचा लाभ घेण्यासाठी सहकारी संस्था, अ.जा./अ.ज. वर्गातील सहकारी संस्था, नोंदणीकृत कंपन्या, खाजगी कंपन्या इत्यादि अर्ज करु शकतील.<br>३) प्रकल्प किंमतीमध्ये भांडवली खर्च व प्रथम वर्षाचा आवर्ती खर्च याचा समावेश राहील. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | ४) अर्जदारास आवश्यक असलेल्या कागदपत्राच्या पुराव्यासह प्रकल्प अहवाल सादर करावा लागेल. तसेच अर्जदाराला शिंपले संवर्धनाबाबतचे तांत्रिक ज्ञान असणे बंधनकारक राहिल.<br>५) प्रस्ताव राज्यशासनामार्फत शिफारशीसह सादर करणे बंधनकारक राहील.<br>**अर्थसहाय्याचे स्वरुप -**<br>१. समुद्र किनारी व खाडीक्षेत्रात सुयोग्य ठिकाणी ५ मी. X ५ मी. आकारमानाचे बांबूचे तराफ्यात (Rack) शिंपल्याचे बीजाचे रोपण करण्यास रू.१५ हजार/ तराफा प्रमाणे अधिकत्तम ४० तराफ्यांसाठी, केंद्रशासनाचे ५० टक्के अधिकत्तम रू.७,५००/बांबू तराफ्यांसाठी अर्थसहाय्य अनुज्ञेय राहील व उर्वरीत ५० टक्के लाभार्थी हिस्सा राहील.<br>२. सदरची योजना मच्छीमार सहकारी संस्था, अनुसचीत जाती/जमाती च्या सहकारी संस्था, महिला स्वंयसहाय्यता बचत गट, खाजगीक्षेत्रातील नोंदणीकृत संस्था इत्यादी यांना अनुज्ञेय राहील.<br>३. सन २०१६-१७ साठी सदर योजनेत २० संचासाठी ५०टक्के म्हणजेच रु.१.५० लक्ष केंद्र शासनाचा हिस्सा राहणार आहे. |
| १२ | खुल्या समुद्रात पिंजरा पध्दतीने संवर्धन (Open sea cage culture):- | लेखाशिर्ष उघडण्याची कार्यवाही स्वतंत्रपणे करण्यात येईल. | रु.२५.०० लक्ष (केंद्र हिस्सा रु.१२.५० लक्ष व लाभार्थी हिस्सा रु.१२.५० लक्ष) | **उद्दिष्टय-** सागरीक्षेत्रात सद्यामासेमारी नौकांच्या सहाय्याने नैसर्गिक मत्स्यसाठयांचे मासेमारी केली जाते. नैसर्गिक मत्स्यसाठा मर्यादीत असून अति मरतूकीमूळे |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | एकूण मत्स्योत्पादन स्थिर झाले आहे. अत्याधुनिक तंत्रज्ञान व शास्त्रोक्त पध्दतीने प्रदुषण विरहीत समुद्र किनारी व खाडीक्षेत्रात पिंजरा पध्दतीने संवर्धनक्षम माश्यांचे संवर्धनकरून सागरी मत्स्योत्पादनात वाढ व स्वंय रोजगार उपलब्ध करण्याच्या दृष्टीने सदर योजना राबविण्याचा उद्देश आहे.<br>**योजनेचे निकष व अटी/ शर्ती-**<br>१) अर्जदाराने संबंधिताकडून पिंजरे लावण्याबाबतची पूर्व परवानगी प्राप्त करणे आवश्यक आहे.<br>२) ठराविक ठिकाणी मच्छीमार सहकारी संस्था, अ.जा./अ.ज., सहकारी संस्था, महिला स्वयंबचत गट, नोंदणीकृत खाजगी संस्था इत्यादि ५ पिंजऱ्यांचे ४ संच मिळून एकूण २० पिंजऱ्यासाठीचा लाभ घेऊ शकतात.<br>३) प्रति युनिट भांडवली, कार्यान्वय व देखभाल खर्च एक वेळ देय राहील.<br>४) अर्जदाराने आवश्यक परवानगी व कागदोपत्री पुरावा व तसेच तांत्रिक ज्ञानाकडून प्राप्त होणारे याबाबतचे स्वयंघोषित प्रस्ताव सादर करणे आवश्यक आहे.<br>**अर्थसहाय्याचे स्वरुप -**<br>१. या योजनेत ६ मी.x ४ मी. किमान परिघाच्या वर्तुळाकार पिंजरे व ९६ वर्ग मिटर क्षेत्र.(६मी.x४ मी.x४ मी.) चौकोनी पिंजऱ्यास रू.५.०० लक्ष प्रती पिंजरा. ठराविक ठिकाणी मच्छीमार सहकारी संस्था, अ.जा./अ.ज., सहकारी संस्था, महिला स्वंयसहाय्यता बचत गट, खाजगीक्षेत्रातील नोंदणीकृत संस्था |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | इत्यादि ५ पिंजऱ्यांचे ४ संच मिळून एकूण २० पिंजऱ्यासाठीचा लाभ घेऊ शकतात. प्रति युनिट भांडवली, कार्यान्वय व देखभाल खर्च एकदाच देय राहील.<br>२. सदर योजने अंतर्गत रु.५.००लक्ष /प्रकल्प च्या मर्यादेत (केंद्रशासनाचे ५० टक्के म्हणजेच रू.२.५० लक्ष/प्रकल्प अर्थसहाय्य अनुज्ञेय राहील व उर्वरीत ५० टक्के लाभार्थी हिस्सा राहील.)<br>३. सन २०१६-१७ साठी सदर योजनेत ५० संचांसाठी ५ टक्के म्हणजेच रु.१२.५० लक्ष केंद्र शासनाचा हिस्सा राहणार आहे. |
| V) | **सागरी क्षेत्रातील पायाभूत सुविधा योजना (Plan for Infrastructure (Marine)** | | | |
| १३ | शितपेटया व बर्फ साठवणूकपेटी विकत घेण्यास अर्थसहाय्य (Assistance for procurement of insulated ice boxes):- | लेखाशिर्ष उघडण्याची कार्यवाही स्वतंत्रपणे करण्यात येईल | रु.२५.०० लक्ष (केंद्र हिस्सा रु.१२.५० लक्ष व लाभार्थी हिस्सा रु.१२.५० लक्ष) | **उद्दिष्टय-** सागरीक्षेत्रातील स्थानिक व पारंपारिक मासेमारी नौकांनी पकडलेल्या माश्यांची विक्री होईपर्यंत मासे सुस्थितीत व आरोग्यदायी (Hygienic) ठेऊन माश्यांना उत्तम बाजार भाव मिळवून देण्यासाठी सदर योजना राबविण्याचे उद्दिष्ट आहे.<br>**योजनेचे निकष व अटी/ शर्ती-**<br>१) फक्त पारंपारिक/स्थानिक (Artisanal) मच्छीमार या योजनेस पात्र राहतील.<br>२) लाभार्थीकडे - (अ) मालकीहक्काचे प्रमाणपत्र,<br>(ब) रिअल क्राफ्ट (ReALCraft) प्रणालीअंतर्गत नौका नोंदणी असावी.<br>(क) मासेमारी परवाना |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | (ड) बायोमेट्रिक कार्ड ओळखपत्र असणे आवश्यक<br>३) प्रत्येक बोटीसाठी प्रत्येकी ५०० किलो ते १००० किलो क्षमतेच्या २ शीतपेटया प्रत्येक नौकेसाठी आर्थिक सहाय्यास पात्र राहतील.<br>४) राज्य शासन/केंद्र शासित प्रदेश यांनी जुन्या नौकांची योग्यरित्या निर्लेखनाची खातरजमा करावी.(जुन्याच्या बदली नविन नौका बाबत)<br>५) शीतपेटयाकरिता अनुदान मिळण्यासाठी अर्जदार सहकारी संस्थेचा सभासद असणे आवश्यक असून त्यांनी संस्थेमार्फत अर्ज करणे आवश्यक आहे.<br>६) सदरचे अनुदान हे ५ वर्षातून एकदा अनुज्ञेय राहील.<br>७) विभागाने मान्य केलेल्या पुरवठाधारकाकडूनच शितपेटया खरेदी करणे बंधनकारक राहील.<br>**अर्थसहाय्याचे स्वरुप –**<br>१. सदर योजनेत प्रत्यक्ष संच किंमतीच्या रू.२५,०००च्या मर्यादेत शितपेटी व बर्फ साठवणूकपेटी विकत घेण्यास प्रती नौकेस (केंद्रशासनाचे ५० टक्के म्हणजेच रू.१२,५०० शितपेटी व बर्फ साठवणूकपेटी विकत घेण्यास प्रती नौकेस अर्थसहाय्य अनुज्ञेय राहील व उर्वरीत ५० टक्के लाभार्थ्यांचा हिस्सा राहील.)<br>२. सदरचे अर्थसहाय्य हे ५०० ते १००० किलो क्षमतेच्या दोन शितपेटया व बर्फ साठणूक पेटीसाठी अनुज्ञेय राहील. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | **३.** सन २०१६-१७ साठी सदर योजनेत १०० संचासाठी ५०टक्के म्हणजेच रु.१२.५० लक्ष केंद्र शासनाचा हिस्सा राहणार आहे. |
| १४ | पारंपारिक/स्थानिक मच्छीमारांना लाकडी ऐवजी फायबर नौका खरेदीस अर्थसहाय्य (Assistance to traditional /artisanal fisherman for procurement of FRP boats and ice box) :- | लेखाशिर्ष उघडण्याची कार्यवाही स्वतंत्रपणे करण्यात येईल. | रु.४०.०० लक्ष (केंद्र हिस्सा रु.२०.०० लक्ष व लाभार्थी हिस्सा रु.२०.०० लक्ष) | **उद्दिष्टय-**सद्या कार्यरत पारंपारिक/ स्थानिक मच्छीमारांना लाकडी नौकांचे आयुष्यमान सिमीत असून वार्षिक देखभालीचा खर्च वारंवार करावा लागतो. तसेच नैसर्गिक साधन सामुग्रीचे जतन करण्यासाठी पारंपारिक / स्थानिक मच्छीमारांना त्यांच्या कार्यरत नौकांच्या बदली कमी देखभाल खर्च व अधिक टिकावू फायबर नौका खरेदी करून आर्थिक बचतीसाठी प्रोत्साहीत करणेस सदर योजनेचा उद्देश आहे.<br>**योजनेचे निकष व अटी/ शर्ती-**<br>१) फक्त पारंपारिक/स्थानिक (Artisanal) मच्छीमार या योजनेस पात्र राहतील.<br>२) लाभार्थीकडे - (अ) मालकीहक्काचे प्रमाणपत्र,<br>(ब) रिअल क्राफ्ट (ReALCraft) प्रणालीअंतर्गत नौका नोंदणी असावी.<br>(क) मासेमारी परवाना<br>(ड) बायोमेट्रिक कार्ड ओळखपत्र असणे आवश्यक<br>३) प्रत्येक बोटीसाठी प्रत्येकी ५०० किलो ते १००० किलो क्षमतेच्या २ शीतपेटया प्रत्येक नौकेसाठी आर्थिक सहाय्यास पात्र राहतील.<br>४) राज्य शासन/केंद्र शासित प्रदेश यांनी जुन्या नौकांची योग्यरित्या निर्लेखनाची खातरजमा करावी.(जुन्याच्या बदली नविन नौका बाबत) |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | ५) शीतपेटयाकरिता अनुदान मिळण्यासाठी अर्जदार सहकारी संस्थेचा सभासद असणे आवश्यक असून त्यांनी संस्थेमार्फत अर्ज करणे आवश्यक आहे.<br>६) सदरचे अनुदान हे ५ वर्षातून एकदा अनुज्ञेय राहील.<br>७) विभागाने मान्य केलेल्या पुरवठाधारकाकडूनच शितपेटया खरेदी करणे बंधनकारक राहील.<br>**अर्थसहाय्याचे स्वरुप-**<br>१. या योजनेअंतर्गत पारंपारिक/ स्थानिक मच्छीमारांना पारंपारिक/ लाकडी नौकांच्या बदली फायबर नौका जाळीसह एकूण १० मी.एकूण लांबीपर्यंत च्या नौकेच्या खरेदीसाठी प्रत्यक्ष किंमत रु.४.०० लाख प्रति नौका) केंद्रशासनाचे ५० टक्के म्हणजेच रू.२.०० लक्ष प्रती नवीन नौका व रू.१२,५०० शितपेटी व बर्फ साठवणूकपेटी विकत घेण्यास प्रती नौकेस अर्थसहाय्य अनुज्ञेय राहील व उर्वरीत ५० टक्के लाभार्थ्यांचा हिस्सा राहील.)<br>२. सन २०१६-१७ साठी सदर योजनेत १० संचांसाठी ५० टक्के म्हणजेच रु.२०.०० लक्ष केंद्र शासनाचा हिस्सा राहणार आहे. |
| १५ | मासेमारी नंतर प्रक्रियेतील पायाभूत सुविधांचा विकास - बर्फ कारखाने व शीतगृह<br>( Development of post-harvest | लेखाशिर्ष उघडण्याची कार्यवाही स्वतंत्रपणे करण्यात येईल. | रु.१००.०० लक्ष (केंद्र हिस्सा रु.५०.०० लक्ष व लाभार्थी हिस्सा रु.५०.०० लक्ष) | **उद्दिष्टय- सागरी** मासेमारी नंतर मासेमारी नौकांनी पकडलेल्या माशांचे विक्री व पणन व्यवस्था होईपर्यंत किनाऱ्यावर माशांचे जतन सुस्थितीत करण्यासाठी किनाऱ्यावर पुरवावयाच्या सोयी-सुविधा अंतर्गत बर्फ कारखाने व शीतगृहे उभारण्याची योजना केंद्र शासनाच्या |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | infrastructure -ice plant) - | | | ५०% अर्थसहाय्यातून राबविण्याचा उद्देश ठेवण्यात आला आहे.<br>**योजनेचे निकष व अटी/ शर्ती–**<br>१) लाभार्थ्याने प्रकल्पाची जागा अतिक्रमण विरहित असल्याचे आणि अर्थसहाय्यासह आवश्यक ना हरकत/परवानगी इत्यादि विस्तृत प्रकल्प प्रस्तावात (DPR) कागदोपत्री पुरावा सादर करणे आवश्यक आहे. जागेसाठी अर्थसहाय्य देय राहणार नाही.<br>२) प्रकल्प किंमत ही अद्ययावत SoRs नुसार प्रकल्प ठिकाणच्या सध्याच्या बाजार दरानुसार देय राहील.<br>३) लाभार्थ्याने प्रकल्पाच्या कार्यरत व देखभालीचा भविष्यकालिन खर्च स्वत: करणार असल्याचे प्रमाणित करण्यात यावे.<br>४) लाभार्थ्याने (i व ii) बाबतची प्रकल्पाची सविस्तर माहिती कागदपत्रांच्या स्वयंघोषित पुराव्यासह सादर करावी.<br>५) प्रस्ताव संबंधित राज्य शासन/केंद्र शासनाच्या स्पष्ट शिफारशी सादर करणे आवश्यक आहे.<br>**अर्थसहाय्याचे स्वरुप –**<br>१. या योजनेअंतर्गत ५० टन क्षमतेपर्यंतच्या बर्फ कारखाना व शीतगृहास रु.२.५० लाख प्रति टन प्रमाणे रु.१००.०० लक्ष प्रति कारखान्याच्या मर्यादेत प्रकल्पास (केंद्रशासनाचे ५० टक्के म्हणजेच रू.५०.०० लक्ष प्रती कारखाना प्रकल्प व उर्वरीत ५० टक्के लाभार्थ्यांचा हिस्सा राहील.) |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | २. सन २०१६-१७ साठी सदर योजनेत ५० टनाचा १ संचासाठी ५०टक्के म्हणजेच रु.५०.०० लक्ष केंद्र शासनाचा हिस्सा राहणार आहे. |
| १६ | मासेमारी बंदर व मासे उतरविणाऱ्या केंद्रावर जेट्टीचे नविन बांधकाम व आधुनिकीकरण/ विस्तारिकरण /दुरुस्ती/नुतनीकरण (Establishment of fishing harbour and fish landing centers) : | मागणी क्र. एच ,८ ४४०५ मत्स्यव्यवसाय वरील भांडवली खर्च, १०३ सागरी मत्स्यव्यवसाय (०१) लहान मासेमारी बंदरे (०१)(०१) मोठी बांधकामे ५३ मोठी बांधकामे **)** (४४०५००४१)**राज्य हिस्सा)**<br>मागणी क्र. एच ,८ ४४०५ मत्स्यव्यवसाय वरील भांडवली खर्च १०३ सागरी मत्स्यव्यवसाय लहान मासेमारी बंदरेकेंद्र पुरस्कृत योजना (०१)(०२) मोठी बांधकामे ५३ मोठी बांधकामे ) (४४०५०३४६)केंद्र हिस्सा) | रु.८००.०० लक्ष (केंद्र हिस्सा रु.४००.०० लक्ष व **राज्य शासन हिस्सा** रु. ४००.०० लक्ष) | **उद्दिष्टय-** सागरी मासेमारी क्षेत्रातील मासेमारी नौकांनी पकडून आणलेली मासळी सागरी किनाऱ्यावर उतरविण्यासाठी तसेच मासेमारीस जाण्यासाठी आवश्यक डिझेल, बर्फ व इतर आवश्यक सामानाची चढ-उतर करण्यासाठी नौकांची ये-जा विनासायास व जलद गतीने होण्यासाठी केंद्र शासनाच्या ५०% अर्थसहाय्यातून विभागामार्फत सोयी-सुविधा पुरविणेस सदर योजनेचे उद्दिष्ट ठेवण्यात आलेले आहे.<br>**<u>योजनेचे निकष व अटी/ शर्ती-</u>**<br>१) योग्य ठिकाण व जागेची पहाणी/ निवड.<br>२) अभियांत्रिकी व सामाजिक - आर्थिक तपासणी व सर्वेक्षण आवश्यक.<br>३) मत्स्यबंदर/मासे उतरविणाऱ्या केंद्रांचे नकाशे व आराखडे.<br>४) आवश्यक तेथे हायड्रोलिक नमुन्याचा अभ्यास<br>५) पर्यावरणीय नाहरकतीसाठी आवश्यक तेथे EIA/EMP चा अभ्यास अहवाल.<br>६) प्रस्तावित मत्स्यबंदर/मासे उतरविणाऱ्या केंद्रासाठी जागेचा ताबा आवश्यक.<br>७) प्रकल्प किंमत ही अद्यावत SoRs नुसार प्रकल्प क्षेत्रात देय असल्यानुसार |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | ८) स्वयंमुल्यधारित प्रकल्प किंमतीसोबत एक ते सातचे कागदोपत्री पुरावा सादर करणे आवश्यक आहे.<br>**अर्थसहाय्याचे स्वरुप -**<br>**१.** प्रत्यक्ष प्रकल्प किंमतीनुसार **प्रकल्पास केंद्रशासनाचे ५० टक्के व उर्वरीत ५० टक्के राज्यशासनाचा हिस्सा राहील.**<br>२. प्रकल्पासाठी केंद्र शासनाच्या अटी-शर्ती नुसार आवश्यक बाबींची पूर्तता राज्यसरकारने करणे आवश्यक राहील.<br>३. सदर योजनेसाठी ५०टक्के म्हणजेच रु.४००.०० लक्ष केंद्र शासनाचा हिस्सा राहणार आहे व उर्वरित रु.४००.०० लक्ष इतका निधी राज्य शासनाने गुंतविणे आवश्यक राहणार आहे.<br>४. सन २०१६- १७ साठी सदर योजनेत २ संचासाठी ५०टक्के म्हणजेच रु.४००.०० लक्ष केंद्र शासनाचा हिस्सा राहणार आहे. उर्वरित रु.४००.०० लक्ष राज्य शासनास गुंतवणूक करावी लागेल. |
| १७ | कार्यरत बर्फ कारखाना व शीतगृह यांचे नुतनीकरण/ आधुनिकीकरण (Renovation / Modernization of existing ice plants cum cold storages)- | लेखाशिर्ष उघडण्याची कार्यवाही स्वतंत्रपणे करण्यात येईल. | रु.६०.०० लक्ष (केंद्र हिस्सा रु.३०.०० लक्ष व लाभार्थी हिस्सा रु. ३०.०० लक्ष) | **उद्दिष्टय-** सागरी क्षेत्रातील मासेमारी नौकांनी पकडून आणलेल्य मासळीस योग्य भाव मिळण्यासाठी मासळीवर विक्री व प्रक्रिया होईपर्यंत मासळीच्या साठवणूकीसाठी, तसेच मासेमारी दरम्यान पकडलेली मासळी ताजी व सुस्थितीत ठेवण्यासाठी नौकेवर बर्फ घेऊन जाणेस मच्छीमार सहकारी संस्था व खाजगी उद्योजकामार्फत बर्फ कारखाने व शीतगृहे उभारण्यात |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | आली आहेत. या बर्फ व शीतगृहांची वेळोवेळी दुरुस्ती, नुतनीकरण व उपलब्ध तंत्रज्ञानारुप नुतनीकरण व आधुनिकीकरण आवश्यक असल्याने सदर योजनेचे उद्दिष्ट निश्चित करण्यात आले आहे.<br>**योजनेचे निकष व अटी/ शर्ती–**<br>१) कार्यरत असलेल्या बर्फ कारखान्यातील इमारतीचे बांधकाम मशिनरी बदलणे, विद्युतीकरण, पाणीपुरवठा इत्यादि बाबीचा समावेश नुतनीकरण/आधुनिकीकरण करण्यासाठी अनुज्ञेय राहिल.<br>२) कार्यरत असलेल्या बर्फ कारखान्याची जागा ही लाभार्थीच्या मालकीची असणे आवश्यक आहे.<br>३) कार्यरत असलेला बर्फ कारखाना हा कमीत कमी १० वर्ष जुना असणे आवश्यक आहे.<br>४) अर्थसहाय्या व्यतिरिक्त उर्वरित रक्कम लाभार्थी ज्या संस्थेकडून कर्ज घेणार त्याबाबतचे कागदपत्र असणे आवश्यक आहे.<br>५) प्रकल्प किंमत ही अद्यावत SoRs नुसार प्रकल्प क्षेत्रात देय असणे आवश्यक आहे.<br>**अर्थसहाय्याचे स्वरुप –**<br>१. सदर योजनेअंतर्गत बर्फ कारखाना व शीतगृहास रु.१.५० लाख प्रति टन प्रमाणे रु.३०.०० लक्ष प्रति कारखान्याच्या मर्यादेत प्रकल्पास) केंद्रशासनाचे ५० टक्के व उर्वरीत ५० टक्के लाभार्थ्यांचा हिस्सा राहील.) |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | २. सन २०१६-१७ साठी सदर योजनेत ४० टन क्षमतेपर्यंतच्या १ संचासाठी ५०टक्के म्हणजेच रु.३०.०० लक्ष केंद्र शासनाचा हिस्सा राहणार आहे. |
| १८ | मच्छीमारांसाठी मासेमारी करतांना सुरक्षिततेची साधने पुरविणे ) Safety of fishermen at sea) | लेखाशिर्ष उघडण्याची कार्यवाही स्वतंत्रपणे करण्यात येईल. | रु.५४७.०० लक्ष (केंद्र हिस्सा रु.२७३.५० लक्ष व **राज्य शासन हिस्सा** रु. २७३.५० लक्ष) | **<u>उद्दिष्टय</u>** - मासेमारी दरम्यान सागरीक्षेत्रातील मासेमारी नौकांवरील खलाशांचे जीवनमान खडतर व असुरक्षित असते. मासेमारी दरम्यान उद्भवणाऱ्या आपात्कालीन स्थितीत नौकेवरील खलाशांच्या व नौकेच्या सुरक्षिततेसाठी इस्त्रो या संस्थेने विकसीत केलेले डॅट ( Distress Alert Transmitter ) सयंत्र पुरवून त्याद्वारे किनाऱ्यावरील सनियंत्रण कक्षाकडे उपग्रहाद्वारे मदतीसाठी व आपदग्रस्त नौकेच्या अचुक ठिकाणाची माहिती देणे शक्य होणार आहे. याकरीता सदर योजना कार्यन्वीत करण्याचे निश्चित करण्यात आली आहे.<br>**<u>योजनेचे निकष व अटी/ शर्ती-</u>**<br>सुरक्षीत किट मध्ये यूपीएस, वायरलेस, इकोसाऊंडर, लाईफ जॅकेट, लाईफबोयाज, डॅट, फिशफाईंडर, search and risk beacon इत्यादि.<br>संबंधित राज्यांनी/केंद्रशासित प्रदेशांनी वरिल बाब क्र.१ मध्ये नमुद केलेल्या बाबीपैकी मासेमारीसाठी आवश्यक असलेल्या साधनांचा समावेश करावा.<br>लाभार्थ्याकडे बोटींचे खालील कागदपत्र असणे आवश्यक आहे.<br>अ) नौका मालकाचे मालकी बाबतचे प्रमाणपत्र |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | ब) रिअल क्राफ्ट अंतर्गत नौका नोंदणी प्रमाणपत्र.<br>क) मासेमारी नौकांचे लायसन्स<br>ड) नौका मालकाचे बायोमेट्रिक कार्ड<br>**अर्थसहाय्याचे स्वरुप** -<br>योजनेअंतर्गत मासेमारी दरम्यान, सागरी क्षेत्रातील मासेमारी नौकांवरील मच्छीमारांच्या सुरक्षिततेसाठी GPS(Global Positioning System), दुरसंभाषण साधने(Communication equipment), इको साऊंडर (Echo Sounder), जीवरक्षक साधने (Lifejacket ), लाईफ बोया (Lifebuoys), डॅट ( Distress Alert Transmitter ), जीवसुरक्षा साधने (VHF, Radiotelephone), फिशफाईंडर (Fishfinder), बॅकअप बॅटरी(Backup Battery), शोध व बचाव इशारा दिवा (Search and Rescue Beacon),इत्यादी उपकरणांच्या पुरवठयासाठी एकूण रू.२.०० लक्ष पुर्ण संचाच्या अर्थसहाय्यासाठी केंद्र शासनाची योजना कार्यान्वित आहे. **या योजनेअंतर्गत उपरोक्त केद्र शासनाची मंजूर व कार्यरत मच्छीमारांसाठी मासेमारी करताना सुरक्षिततेची साधने पुरविणे योजनेतील डॅट (Distress Alert Transmitter) चा पुरवठा करण्यासाठी राज्य शासनाची ५० टक्के अर्थसहाय्यासह नवीन योजनेस मान्यता देवून केंद्र शासनाचे ५० टक्के अधिकतम रु.२०००० प्रति डॅट संच व उर्वरित** |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | **५० टक्के राज्य शासनाचा हिस्सा राहणार आहे.** सन २०१६-१७ साठी सदर योजनेत २७३५ लाभार्थ्यांसाठी ५० टक्के म्हणजेच रु.२७३.५० लक्ष केंद्र शासनाचा हिस्सा राहणार आहे. उर्वरित ५० टक्के राज्य शासनास गुंतविणे आवश्यक आहे. |
| **VI)** | **बचत व मदतीद्वारे मच्छीमारांच्या कल्याणासाठी राष्ट्रीय योजना (Plan for saving cum Relief Welfare)** | | | |
| १९ | अधिक्रमित करुन क्रियाशील मच्छीमारां करिता गट विमा योजना (Group Insurance):- शा.नि. क्र. मत्स्यवि /१००७प्र.क्र.८९/ पदुम ,१४- दि.१८.१२.२००८ | मागणी क्र. डी ६, २४०५ मत्स्यव्यवसाय (००)(८००) इतर खर्च,०२ योजनाअंतर्गत योजना (०२)(०९) फिश कोप (फेड) मार्फत कार्यरत मच्छिमारांकरीता अपघात गट विमा योजना (२४०५ ४८८५) (३१ सहायक अनुदाने ) राज्य हिस्सा (केंद्र हिस्सा फिश कोप संस्थेस परस्पर केंद्र शासनामार्फत जमा करण्यात येतो, त्यामुळे लेखाशिर्ष नाही.) | रु.६५.८६ लक्ष (केंद्र हिस्सा रु.३२.९३ लक्ष व **राज्य शासन हिस्सा** रु. ३२.९३ लक्ष) | **उद्दिष्टय** - भू-जलाशयीन तसेच सागरीक्षेत्रातील क्रियाशील मच्छीमार नैसर्गिक आपत्तीमुळे किंवा अन्य कोणत्याही कारणास्तव होणाऱ्या अपघातामुळे मृत्यु ओढावल्यास अथवा अपंगत्व आल्यास मच्छीमाराच्या वारसदारास मदत म्हणून देण्याची केंद्रशासन सहाय्यीत योजना सद्या कार्यरत आहे.<br>**योजनेचे निकष व अटी/ शर्ती-**<br>१. परवाना धारक/नोंदणीकृत मच्छीमाराचा मृत्यू झाल्यास रु.२.०० लक्षचा विमा किंवा कायमस्वरुपी अपंगत्व आल्यास रु.१.०० लक्ष आणि रु.१००००/- दवाखान्यात भरती दरम्यान उपचारासाठीच्या खर्चास अनुज्ञेय राहील.<br>२. विम्याचा कालावधी १२ महिन्याचा असेल.<br>३. ही योजना राष्ट्रीय मत्स्यजीवी सहकारी संघ (FISHCOPFED) किंवा नेमलेल्या संस्था/संघामार्फत राबविली जाईल. विमा धारक मच्छीमारांची केंद्र शासनाची अनुज्ञेय विमा रक्कम |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | संबंधित संस्था/संघास परस्पर जमा केली जाईल.<br>४. जे राज्य किंवा केंद्र शासित प्रदेश, ही योजना FISHCOPFED किंवा नेमलेल्या संस्था/संघामार्फत राबवित नसतील तर विमाधारक मच्छीमारांची केंद्र शासनाची अनुज्ञेय विमा रक्कम ही किमान विमा हप्त्याच्या मर्यादेत राहील.<br>५. केंद्र शासनामार्फत प्राधिकृत मंडळाकडून **प्रधानमंत्री सहाय्यता बिमा योजना** ( PMSBY ) या योजनेत रुपांतरीत करेपर्यंत सदर योजना कार्यरत राहणार आहे.<br>**अर्थसहाय्याचे स्वरुप** –<br>१. विमा हप्ता रु.२०.३४ प्रति मच्छीमार प्रति वर्ष )विमा हप्त्याचादर वर्षनिहाय राहील) सदर रक्कमेपैकी ५०टक्के विमा हप्ता रु.१०.१७ प्रति वर्ष केंद्र शासनामार्फत देय राहील व उर्वरित ५०टक्के राज्य शासनाचा हिस्सा राहील.<br>२. सन २०१६-१७ साठी सदर योजनेत ३२३८३८ लाभार्थ्यांसाठी ५० टक्के म्हणजेच रु.३२.९३ लक्ष केंद्र शासनाचा हिस्सा राहणार आहे. त्याप्रमाणात राज्य शासनास रु.३२.९३ लक्ष इतका सहभाग नोंदविणे आवश्यक राहील. |
| २० | मच्छीमारां करिता राष्ट्रिय कल्याणकारी बचतीसह मदतीची योजना (National Scheme of welfare of fishermen saving cum relief):- | लेखाशिर्ष उघडण्याची कार्यवाही स्वतंत्रपणे करण्यात येईल. | रु.६०.०० लक्ष (केंद्र हिस्सा रु.३०.०० लक्ष व **राज्य शासन हिस्सा** रु. ३०.०० लक्ष) | मत्स्यव्यवसाय विभागातील सहकारी संस्थेच्या दारिद्रय रेषेखालील क्रियाशील मच्छीमार सभासदांसाठी मासेमारी बंदीच्या कालावधीत उदरनिर्वाह होण्याच्या दृष्टीने केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनानुसार मच्छीमारांसाठी राष्ट्रिय कल्याणकारी बचतीसह मदतीची |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | योजना (Saving Cum Relief ) देण्याबाबतची राज्य शासनाच्या समभागासह नवीन योजना सुरू करण्याचे उद्दीष्ट आहे.<br>**योजनेचे निकष व अटी/ शर्ती–**<br>१) लाभार्थी मच्छीमार हा पूर्णवेळ मासेमारी व्यवसाय करणारा क्रियाशील मच्छीमार असावा.<br>२) लाभार्थी मच्छीमार हा स्थानिक सहकारी संस्थेचा, संघाचा किंवा नोंदणीकृत संस्थेचा सभासद असावा.<br>३) लाभार्थी दारिद्रय रेषेखालील असावा. लाभार्थ्याचे वय १८ ते ६० वर्ष या वयोमर्यादेत असावे.<br>४) लाभार्थी मच्छीमाराने ९ महिन्याच्या मासेमारी कालावधीत वार्षिक रु.१५००/- वर्गणी म्हणून बचत करावी. एकत्रित वर्गणी एक किंवा दोन महिन्यात घेण्यात येवू नये. ती किमान तीन हप्त्यात विभागाकडे जमा करणे आवश्यक राहील. लाभार्थ्याने या योजनेअंतर्गत रु.१५००/- प्रति वर्ष जमा करणार असल्याचे स्वयंघोषित प्रतिज्ञापत्र द्यावे.<br>५) राज्य/केंद्रशासित प्रदेश लाभार्थ्यास याशिवाय अतिरिक्त अनुदानित लाभ जसे शिधा, इंधन इत्यादि PDS अंतर्गत देऊ शकतात.<br>६) राज्य/केंद्र शासित प्रदेश यांनी स्वयंघोषित प्रकल्पप्रस्तावासोबत उपरोक्त (१) ते (४) कागदोपत्री पुरावा इतरबाबीसह जसे कमी उत्पादित/बंदी कालावधी महिने, लाभार्थ्याचे नोंदणी व त्यांचा समभाग, मच्छीमाराची वर्गवारी |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | (अ.जा./अ.ज.), राज्य अर्थसंकल्पात राज्य हिश्श्याचा समभागाचा अर्थसंकल्पिय तरतूद इत्यादि.<br>७) जमा होणारी एकूण रक्कम रु.४५००/- नोंदणी झालेल्या मच्छीमारांना ही तीन समान हप्त्यात कमी उत्पादित/बंदी कालावधी महिन्यात प्रति वर्ष वितरित करण्यात यावे.<br>**अर्थसहाय्याचे स्वरुप -**<br>१. सदर योजनेअंतर्गत मच्छीमार सहकारी संस्थेच्या मच्छीमाराने ९ महीन्याच्या मासेमारी कालावधीत किमान ३ हप्त्यात एकूण रू.१५०० प्रति वर्ष लाभार्थी समभाग जमा करणे आवश्यक आहे.<br>२. या योजनेत राज्याचे ५० टक्के व केंद्र शासनाचे ५० टक्के म्हणजे प्रत्येकी रू.१५०० प्रति लाभार्थी प्रति वर्ष अर्थसहाय्य देय राहील. लाभार्थ्यांस DBT द्वारे अनुज्ञेय राहील.<br>**३.** सन २०१६-१७ साठी सदर योजनेत २०००लाभार्थ्यांसाठी ५० टक्के म्हणजेच रु.३०.०० लक्ष केंद्र शासनाचा हिस्सा राहणार आहे. त्याप्रमाणात <u>राज्य शासनास रु३०.०० लक्ष इतका सहभाग नोंदविणे आवश्यक राहील.</u> |
| <u>VII</u> | <u>कल्याणकारी घरकूल योजना (Plan for Housing)</u> | | | |
| २१ | <u>अधिक्रमित करुन</u> मच्छीमारांसाठी घरकूले (Housing for Fishers):-<br>*शा.नि. क्र. मत्स्यवि २४१०/प्र.क्र.१५९/* | *मागणी क्र. डी,६- २४०५मत्स्यव्यवसाय १२०(०२) मत्स्यव्यवसाय सहकारी संस्था, पंचवार्षिक योजनेअंतर्गत* | रु.७८.०० लक्ष (केंद्र हिस्सा रु.३९.०० लक्ष व **राज्य शासन हिस्सा** रु. ३९.०० लक्ष) | **उद्दिष्टय-** राष्ट्रीय कल्याण निधी योजनेअंतर्गत दारिद्रय रेषेखालील आणि दुर्बल घटकातील क्रियाशील मच्छीमारांसाठी प्राधान्याने व अल्प उत्पन्न घटकातील क्रियाशील मच्छीमारांसाठी सुरक्षित निवारा उपलब्ध करून देण्याच्या |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | *पदुम ,१३- दि.२०.१.२०१४* | *योजना, (०९)(०२) राष्ट्रीय कल्याण निधी योजनेअंतर्गत मच्छिमारांसाठी घरकूल योजना )राज्य योजना) ३३ अर्थसहाय्य)* ***राज्य हिस्सा)*** *मागणी क्र. डी ,६- २४०५मत्स्यव्यवसाय १२०(०२) मत्स्यव्यवसाय सहकारी संस्था, पंचवार्षिक योजनेअंतर्गत योजना,(०२)(१०) राष्ट्रीय कल्याण निधी योजनेअंतर्गत मच्छिमारांसाठी घरकूल योजना )केंद्र पुरस्कृत योजना) ३३ (२४०५१०५३) अर्थसहाय्य)* ***केंद्र हिस्सा)*** | | दृष्टीने सदर योजना प्रस्तावित करण्यात आली आहे.<br>**योजनेचे निकष व अटी/ शर्ती-**<br>१) प्रति घरकुलासाठी प्रसाधनाच्या सोयीसह प्लिंथ एरिया किमान २५ स्क्वेअर मिटर असणे आवश्यक आहे.<br>२) लाभार्थी क्रियाशील मच्छीमार असावा.<br>३) दारिद्रयरेषेखालील मच्छीमाराला प्राधान्य देण्यात यावे.<br>४) कच्चे घर असलेल्या लाभार्थ्यांना सुध्दा पक्के घरासाठी या योजनेअंतर्गत विचार करण्यात यावा.<br>५) किमान एकत्रित २० घरकुलांचा विकास करण्यात यावा.<br>६) राज्य/केंद्र शासित प्रदेश या व्यतिरिक्त इतर अधिक बाबींचे सहाय्य, जसे प्रसाधनाच्या सोयी, पाणी, वीज इत्यादि देऊ शकतात.<br>**अर्थसहाय्याचे स्वरुप -**<br>१. सदर योजनेअंतर्गत किमान २५ चौरस मीटर कार्यक्षेत्राचे प्रसाधन गृहाच्या सोयीसह केंद्र व राज्यशासनाच्या ५०:५० टक्के अर्थसहाय्यातून जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेमार्फत घरकूल बांधण्याची योजना राबविण्यात येईल.<br>२. नवीन घराच्या बांधकामासाठी रु.१२००००/- प्रति घर प्रमाणे ५० टक्के म्हणजेच रु.६००००/- केंद्र शासनाचा हिस्सा राहील व उर्वरित ५०टक्के रक्कम राज्य शासनाने गुंतविणे आवश्यक राहील.<br>३. सन २०१६-१७ साठी सदर योजनेत ६५मच्छीमारांच्या घरांसाठी ५० टक्के म्हणजेच |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | रु.३९.०० लक्ष केंद्र शासनाचा हिस्सा राहणार आहे. त्याप्रमाणात राज्य शासनास रु.३९.०० लक्ष इतकी गुंतवणूक करणे आवश्यक राहील. |

उपरोक्त २१ योजनांसाठी एकूण रु.२९४१.८६ लक्ष इतका निधी मंजूर करण्यात आला असून त्यापैकी रु.१४७०.९३ लक्ष इतका केंद्र हिस्सा, रु.७७५.७३ लक्ष राज्य हिस्सा व रु.६९५.५० लक्ष लाभार्थी हिस्सा राहणार आहे.

उपरोक्त योजनेसाठी होणारा खर्च कार्यरत योजनांसाठी संबंधित योजनांचे लेखाशिर्षातून तसेच नवीन योजनेसाठी होणारा खर्च हा नव्याने उपलब्ध होणाऱ्या लेखाशिर्षाखाली उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात येईल.

सदर शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०६१६४२३५८८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chitrakala Suryawanshi

Digitally signed by Chitrakala Suryawanshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b61aaca1243458a7300585877d01b18c73211c3f79c97f57bd06e1e79a2a57ae, cn=Chitrakala Suryawanshi
Date: 2017.03.06 17:40:01 +05'30'

**(चि.नि.सुर्यवंशी)**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा. मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव
३. मा.मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव
४. मा.राज्यमंत्री(पदुम) यांचे खाजगी सचिव
५. सचिव,भारत सरकार,कृषि मंत्रालय,(पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्स्यव्यवसाय विभाग) कृषि भवन,नवी दिल्ली
६. मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. अपर मुख्य सचिव (नियोजन), मंत्रालय, मुंबई
८. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई
९. सचिव (सहकार), मंत्रालय, मुंबई
१०. आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
११. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
१२. प्रादेशिक उपायुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई/ पुणे/ नाशिक /औरंगाबाद/ लातूर/अमरावती/ नागपूर
१३. सर्व सहायक आयुक्त, मत्स्यव्यवसाय
१४. महालेखापाल १ /२, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) मुंबई / नागपूर

१५. अधिदान व लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
१६. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
१७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१८. सर्व उप कोषागार अधिकारी
१९. सहसंचालक, लेखा व कोषागरे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालयासमोर,मुंबई
२०. राष्ट्रीय मत्स्यजीवी सहकारी संघ, नवी दिल्ली (FISHCOPFED),७ सरिता विहार इन्स्टीटयुशनल एरिया, नवी दिल्ली ११००७६
२१. अवर सचिव/ कक्ष अधिकारी (पदुम १२, पदुम १४, पदुम १६)
२२. निवडनस्ती